**रोजगार स्वयंरोजगार केंद्राचे संगणकीकरण**
**संगणक यंत्रणा खरेदी करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
शासन निर्णय कमांक : रोस्वरो-२०१०/प्र.क्र.२१३/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. १७ सप्टेंबर, २०१०.

वाचा : आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र
क्रमांक :रोस्वसं--७/संगणक/२०१/९४२१. दि. १२.०८.२०१०

**शासन निर्णय**

रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाच्या अधिनस्त कार्यालयांकरीता सन २००४-०५ मध्ये खरेदी करण्यात आलेल्या संगणक यंत्रणेचे आयुर्मान डिसेंबर, २०१० अखेर संपुष्टात येत असल्याने त्याऐवजी नवीन संगणक यंत्रणा खरेदी करणे तसेच रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रांची संगणक यंत्रणा पुरवण्याची मागणी लक्षात घेऊन पहिल्या टप्प्यात महाराष्ट्र शासनाच्या दर करारानुसार संगणक यंत्रणा खरेदी करण्यास व त्यावर होणा-या रु. ४९,९८,५६५/-(रुपये एकोणपन्नास लाख अठ्यान्नव हजार पाचशे पासष्ट फक्त) खर्चास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | खरेदी करावयाची संगणक सामग्री | पुरवठादाराचे नाव | दर करारानुसार प्रति युनिट किंमत (रुपये) | खरेदी करावयाची संख्या | एकूण किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १ | मीड रेंज पीसी एएमडी प्रोसेसर सह | मे. ओमेगा सिस्टीम्स्. | २६,९९१ | १५५ | ४१,८३,६०५ |
| २ | नेटवर्क लेसर ए-४- प्रिंटर | मे. एसब्रेन सिस्टीम ॲन्ड सॉफ्टवेअर प्रा.लि. | ९,७४० | ५९ | ५,७४,६६० |
| ३ | १३६ कॉलम डॉटमॅट्रीक्स प्रिंटर मेक ॲन्ड मॉडेल इप्सन एल क्यू ११५० II | मे. एसब्रेन सिस्टीम ॲन्ड सॉफ्टवेअर प्रा.लि. | ८,९०० | २७ | २,४०,३०० |
| | | | | एकूण | ४९,९८,५६५ |

२. सदर मंजूरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

(१) संगणक यंत्रणेची खरेदी विहित कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी.

(२) यंत्र सामुग्री प्राप्त झाल्याखेरीज व ते निश्चित केलेल्या विनिर्दीष्टाप्रमाणे असल्याची खातरजमा केल्याखेरीज तसेच यंत्रांच्या गुणवत्तेची खात्री पटल्याखेरीज कंपनीस रक्कम प्रदान करण्यात येवू नये.

(३) सदर खरेदी राष्ट्रीय सुचना विज्ञान केंद्राच्या सल्ल्याने करण्यात यावी.

(४) सदर संगणक यंत्रणेची नोंद संबधित कार्यालयांच्या जडसंग्रह नोंदवहीत घेण्यात यावी.

३. आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांनी विहित पध्दतीने सदर खरेदी करावी. तसेच सदरहू निधी प्रत्यक्ष खर्च करताना प्रचलित नियम तसेच वित्तीय नियमावलीतील तरतूदी यांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. यावरील खर्च हा ''मागणी क्रमांक झेडए-१, २२३०-कामगार व सेवायोजन, ०२ सेवायोजन सेवा, ००१ संचालन व प्रशासन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०१) सेवायोजन कार्यालयांत संगणीत्राची पध्दती सुरु करणे, १३ कार्यालयीन खर्च (२२३० १०९२) योजनांर्गत'' या लेखाशीर्षाखाली सन २०१०-११ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सीओएम-१००१/ प्र.क्र.१७४/ ०१/३९, दि.२९.१०.२००१ नुसार स्थापन केलेल्या संगणक प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिनांक ३१/०८/२०१० रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९२७१४१२१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(वि. रा. शिरसाट)
शासनाचे उप सचिव

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, रोस्वरो-२, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे,
अपर कोषागार अधिकारी, उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
निवड नस्ती (रोस्वरो-१).